राज्यातील पोलीस विभागाच्या निवासी व अनिवासी इमारतींच्या दुरुस्तीसाठी निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्र. पोप्रमा - ०११७/प्र.क्र. ८० / पोल-७,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : २० मार्च, २०१७.

वाचा :- १) शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक सीआरपी ०५१६/ प्र.क्र. ३३७/ पोल-७, दिनांक १५.०२.२०१७.
२) शासन निर्णय गृह विभाग, क्रमांक पोप्रमा ०११७/ प्र.क्र. ८० / पोल-७, दिनांक २८.०२.२०१७.
३) पोलीस महासंचालक कार्यालयाचे पत्र क्र. पोमसं/ २७-अ/ पुरवणी अनुदान (अर्थसंकल्पीय अधिवेशन- २०१६-१७/ ४३/ २०१६, दि. ०७.०२.२०१७
४) शासन निर्णय, गृह विभाग, क्र.सीआरपी - ०११७/प्र.क्र. ८० / पोल-७, दिनांक १४ मार्च, २०१७
५) पोलीस महासंचालक कार्यालयाचे पत्र क्र. पोमसं/ २७-अ/ पुरवणी अनुदान (अर्थसंकल्पीय अधिवेशन- २०१६-१७/ ४३/ २०१६, दि. २०.०३.२०१७

प्रस्तावना:-

राज्यातील पोलीस निवासी व कार्यालयीन इमारतींची दुरुस्ती करण्यासाठीच्या प्रस्तावांसाठी सन २०१६-१७ च्या पावसाळी अधिवेशनात व हिवाळी अधिवेशनात पुरवणी मागणी प्रस्तावाद्वारे मंजूर करण्यात आलेला रु. ८२,१४,३१,०००/-(रुपये ब्याऐंशी कोटी चौदा लक्ष एकतीस हजार फक्त/-) इतका निधी तसेच तंटामुक्त गांव (२०५५ ०५३३) या लेखाशिर्षामधून पुनर्विनियोजीत करण्यात आलेला रु.२६,७४,००,०००/- (रुपये सव्वीस कोटी चौऱ्याहत्तर लक्ष फक्त/-) इतका निधी महाराष्ट्र पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळाकडे जमा करण्यास अनुक्रमे संदर्भ क्र.१ व २ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

पोलीस महासंचालक कार्यालयाने संदर्भ क्र. ३ येथील पत्रान्वये राज्यातील पोलीस निवासी व अनिवासी इमारतींच्या दुरुस्तीच्या ज्या प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे अशा कामांसाठी निधी उपलब्ध करुन देण्याचा प्रस्ताव सादर केलेला आहे. सदरहू प्रस्तावाच्या अनुषंगाने दिनांक १४ मार्च, २०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये दुरुस्तीच्या कामांसाठी रु.२१३४.३२लक्ष इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात आली आहे. पोलीस महासंचालक कार्यालयाच्या संदर्भ क्र. ३ व संदर्भ क्र. ५ येथील पत्रान्वये प्राप्त अहवालच्या अनुषंगाने राज्यातील पोलीस निवासी व अनिवासी इमारतीच्या दुरुस्तीसाठी प्रकल्पनिहाय निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन असल्याने त्याबाबत खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे :-

शासन निर्णय:-

राज्यातील पोलीस विभागाच्या निवासी व अनिवासी इमारतींच्या दुरुस्तीसाठी प्रशासकीय मान्यता दिलेल्या कामांना सोबत जोडलेल्या विवरण पत्र “अ” मध्ये नमूद केल्याप्रमाणे निधी उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदरचा निधी पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य मुंबई/ व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ मर्यादित, मुंबई यांनी संबंधित पोलीस अधीक्षक/ समादेशक/ प्राचार्य, पोलीस प्रशिक्षण केंद्र यांच्यामार्फत संबंधित कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांना उपलब्ध करण्यात यावा. ज्या कामांना यापूर्वी निधी उपलब्ध करुन दिलेला आहे अशा दुरुस्तीच्या कामांची पाहणी संयुक्तपणे सार्वजनिक बांधकाम विभागाच्या संबंधित अधिकाऱ्यांसमवेत पोलीस अधीक्षक/ अपर पोलीस अधीक्षक दर्जाच्या अधिकाऱ्यांकडून करण्यात यावी. तसेच दुरुस्तीची कामे समाधानकारकरित्या करण्यात आल्याचे प्रमाणपत्र संबंधित घटक प्रमुख यांनी पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य यांना सादर करावे. प्रमाणपत्र / उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त झाल्यानंतर निधी वितरीत करण्याची कार्यवाही करण्यात यावी.

४. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.om या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून, संगणक सांकेताक २०१७०३२१११५३४२२४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2017.03.21 11:56:09 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ मर्या, वरळी, मुंबई.
३. पोलीस आयुक्त ठाणे शहर
४. प्राचार्य, पोलीस प्रशिक्षण केंद्र दौंड, पुणे
५. समादेशक, राज्य राखीव पोलीस बल गट क्र. ४, नागपूर, गट क्र.५ दौंड, गट क्र.७ दौंड
६. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
७. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
८. अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
९. वित्त विभाग, (व्यय-७,/ अर्थ-११/अर्थोपाय) मंत्रालय, मुंबई.
१०. गृह विभाग, (बीयुडी-१/ बीयुडी-२) मंत्रालय, मुंबई.
११. निवड नस्ती (पोल-७).

## विवरणपत्र "अ"

**(रुपये लाखात)**

| अ.क्र. | प्रशासकीय मान्यता दिलेल्या कामांचा तपशिल | शासन निर्णय क्रमांक व दिनांक | अंदाजपत्रकीय रक्कम (रुपये) | वितरीत केलेला निधी (रुपये) | समर्पित केलेला निधी | वितरीत करावयाचा निधी(रुपये) |
|---|---|---|---|---|---|---|
| १. | ठाणे जिल्ह्यातील पोलीसांच्या निवासी इमारतीची दुरुस्ती करणे | शासन निर्णय क्र. सीआरपी ०९१४/ प्र.क्र.२११/पोल-७, दि. १५.११.२०१४ | ९३०.९३ | ६८८.०७ | १७१.०७ | ४१३.९३ |
| २. | रा.रा.पो. बल गट क्र. ४ नागपूर येथे पोलीसांच्या निवासी इमारतीची दुरुस्ती करणे | शासन निर्णय क्र. सीआरपी ०४१४/ प्र.क्र. ९४/पोल-७, दि. ०३.०६.२०१४ | ४५४.४७ | ३३५.९१ | ३३५.९१ | ३८९.५७ |
| ३. | प्राचार्य, पोलीस प्रशिक्षण केंद्र दौंड, पुणे येथील निवासी व कार्यालयीन इमारतीची दुरस्ती करणे | शासन निर्णय क्र. सीआरपी १०१४/ प्र.क्र.२१६/पोल-७, दि. २६.०४.२०१६ | ७१६.४७ | १३९.४२ | -- | ५७७.०५ |
| ४. | प्राचार्य, राज्य राखीव पोलीस बल, प्रशिक्षण केंद्र, नानवीज, दौंड, पुणे येथील निवासी व कार्यालयीन इमारतीची दुरुस्ती करणे | शासन निर्णय क्र. सीआरपी ०२१६/ प्र.क्र.१६२/पोल-७, दि. २६.०४.२०१६ | ९६९.४९ | १८८.६६ | -- | ७८०.८३ |
| ५. | समादेशक, राज्य राखीव पोलीस बल गट क्र.५, दौंड, पुणे येथील निवासी इमारतींची दुरुस्ती करणे | शासन निर्णय क्र. सीआरपी ०२१६/ प्र.क्र.१५७/पोल-७, दि. २६.०४.२०१६ | ४१५२.७६ | ८०८.६० | -- | ३३४४.१६ |
| ६. | समादेशक, राज्य राखीव पोलीस बल गट क्र.५ व ७, दौंड, पुणे येथील निवासी इमारतींच्या अंतर्गत रस्त्यांची दुरुस्ती | शासन निर्णय क्र. सीआरपी ०३१६/ प्र.क्र.३१६/पोल-७, दि. २३.०८.२०१६ | ९९०.५७ | १९२.७६ | -- | ७९७.८१ |
| ७. | समादेशक, राज्य राखीव पोलीस बल गट क्र.५, दौंड, पुणे येथील १८० निवासस्थानांची दुरुस्ती | शासन निर्णय क्र. सीआरपी ०३१६/ प्र.क्र.२३५/पोल-७, दि. २३.०८.२०१६ | १०८८.९० | २११.६० | -- | ८७७.३० |
| | | | | | **एकुण** | **७१८०.६५** |